**राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे या कार्यालयातील सह संचालक पदाचे नामाभिधान शिक्षण सह संचालक (शिक्षण सक्षमीकरण शाखा) असे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. निसूची-२०२३/प्र.क्र.५५/प्रशा-५.**
चौथा मजला, मंत्रालय विस्तार इमारत.
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई.
दिनांक :- २८ ऑगस्ट, २०२३.

वाचा:- १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१००२/ (१५९/०२) /प्रशा-५, दिनांक १७ मार्च, २००३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग- अधिसूचना क्र.सेप्रनि-४७१६/प्र.क्र.२५९/प्रशा-२, दिनांक २२ मार्च, २०१८.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग- अधिसूचना क्र.सेप्रनि-४७१६/प्र.क्र.२५८/प्रशा-२, दिनांक २२ मार्च, २०१८.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दिनांक १७.०३.२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे या कार्यालयासाठी सहसंचालकाचे १ पद निर्माण करण्यात आले आहे. तसेच, संदर्भाधीन अ.क्र.२ येथे नमूद दिनांक २२.०३.२०१८ रोजीच्या शासन अधिसूचनेनुसार शिक्षण सहसंचालक (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या पदाचे सेवाप्रवेश नियम अधिसूचित करण्यात आले आहेत. मात्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अ.क्र.१ येथील आकृतीबंधात शिक्षण सहसंचालक (शिक्षण सक्षमीकरण शाखा) असे पदनाम नमूद नसल्याने, सदर पदावर पदोन्नती देण्यासाठी अडचण निर्माण झाली आहे. सदर अडचण दूर करण्यासाठी राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे या कार्यालयातील सहसंचालक या पदाचे नामाभिधान शिक्षण सहसंचालक (शिक्षण सक्षमीकरण शाखा) असे करण्याची बाब विचाराधीन होती. त्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे या कार्यालयातील सहसंचालक या पदाचे नामाभिधान शिक्षण सहसंचालक (शिक्षण सक्षमीकरण शाखा) असे करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०२३०८२८१३०९१०६४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by NISHA MANOHAR MAHAJAN
Date: 2023.08.28 14:27:15 +05'30'

**( निशा म.महाजन )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
४. शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. शिक्षण संचालक, शिक्षण संचालनालय (योजना) , महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
८. सर्व सह सचिव/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव, साप्रवि (कार्या-१२), मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व संबंधित कार्यालय प्रमुख.
१२. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. निवडनस्ती/प्रशा-५.